खाजगी संस्थामार्फत चालविण्यात येणारी अनुदानित मागासवर्गीय वसतिगृहे प्रवेश नियमावलीत सुधारणा करणे

महाराष्ट्र शासन
समाज कल्याण, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व पर्यटन विभाग
मंत्रालय, मुंबई 32.

शासन निर्णय :- क्र. बीसीएच/1086/ 56198/ 65/ बीसीडब्ल्यु 4 दिनांक 5 जुन 1986.

वाचा – संचालक, समाज कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र. बीसीएच /185/मागण्या/ का 1 दिनांक 12 मार्च 1986.

शासन निर्णय – शासन निर्णय, समाज कल्याण, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व पर्यटन विभाग, क्र बीसीएच– 11086/90385/351/ बीसीडब्ल्यु/ दिनांक 3 जानेवारी 1986 अन्वये शासन निर्णय, समाज कल्याण, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व पर्यटन विभाग, बीसीएच– 1082/90385/38/ बीसीडब्ल्यु 4/ दिनांक 16 मे 1984 मधील परिशिष्ट अ मधील प्रवेश नियम 1 रद्द करुन त्याऐवजी खालीलप्रमाणे सुधारणा करण्यात आली आहे.

प्रत्येक शासकिय वसतिग्रहात मान्य संख्येच्या 3 टक्के जागा अपंगांसाठी राखून ठेवण्यात याव्यात आणि त्या नियमाप्रमाणे म्हणजेच गुणवत्तेनुसार भरण्यात याव्यात.

3. वरील सुधारणा विचारात घेता अनुदानित वसतिग्रह मान्यता व अनुदान योजनेतर्गत खाजगी संस्थामार्फत चालविण्यात येणा–या वसतिग्रहाबाबत शासन निर्णय शासन निर्णय, समाज कल्याण, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व पर्यटन विभाग, क्र बीसीएच– 1079/42263/कं.नं. 492/ बीसीडब्ल्यु 4/ दिनांक 22 नोव्हेंबर 1983 अन्वये तयार केलेल्या नियमावलीतील नियम क्र. 9 प्रवेशाची पध्दत मध्ये खालीलप्रमाणे सुधारणा करण्यास शासन मान्यता देत आहेत.

अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती व विमुक्त व भटक्या जमाती, आर्थिक द्रष्ट्या मागासवर्गीय विद्यार्थी यामध्ये अपंग विद्यार्थी उपलब्ध असल्यास प्रवेशासाठी त्यास प्रथम प्राधान्य देण्यात यावे व त्या त्या संवर्गाच्या टक्केवारीतच अपंग विद्यार्थ्यास सामावून घ्यावे. मात्र असे प्रवेशित विद्यार्थी मान्य संख्येच्या 5 टक्के पेक्षा अधिक असु नयेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने

य. ब. कांबळे

सहायक सचिव,
महाराष्ट्र शासन पुणे

GR 200209251043570 0-1500